**मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-३ प्रकल्पामधील राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन यांना वितरित करण्याबाबत (सन २०२४-२५)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.२१०/नवि-७**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २७ मार्च, २०२५.**

**पहा :**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमएमआर-३३११/प्र.क्र.१४९/नवि-७, दि.०३/०३/२०१४.
२. गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे K-१४०११/३६/२००९-Metro/MRTS-II (Vol.III), दि.१८/०७/२०१४ रोजीचे पत्र.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमएमआर-३३१६/प्र.क्र.९७/नवि-७, दि.२५/०८/२०२२.
४. गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे K-१४०११/२०/२०१६/MRTS-II, दि.२९/०२/२०२४ रोजीचे पत्र.
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि. १ एप्रिल, २०२४.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.१०/नवि-७, दि.२७ मार्च, २०२४.
७. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२४/प्र.क्र.७३/नवि-७, दि.१४/०५/२०२४.
८. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३१६/प्र.क्र.९७(भाग-४)/नवि-७, दि.०२/०७/२०२४.
९. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२४/प्र.क्र.७९/नवि-७, दि.२६/०९/२०२४.
१०. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२४/प्र.क्र.२१०/नवि-७, दि.२०/०१/२०२५.

**प्रस्तावना :**

मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-३ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी केंद्र व राज्य शासनाचा ५०:५० सहभाग असलेल्या मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. स्थापन करण्यात आली आहे. केंद्रीय शहर विकास मंत्रालयाचे पत्र क्रमांक No.K-१४०११/३६/२००९-Metro/MRTS-II (Vol.III), दिनांक १८ जुलै, २०१४ चे पत्रानुसार मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-३ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी केंद्र व राज्य शासनाचा ५०:५० सहभाग असलेल्या मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. विशेष हेतू वाहन कंपनी स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली होती.

राज्य व केंद्र शासनाने प्रशासकीय मान्यता दिलेल्या मूळ प्रकल्प किंमत रु. २३१३६ कोटी मध्ये वाढ करुन दिनांक १०.०८.२०२२ रोजी झालेल्या राज्य मंत्रिमंडळ बैठकीमध्ये रु. ३३४०५.८२ कोटी खर्चाच्या सुधारित वित्तीय आराखड्यास तसेच सन २०२१ ते २०२४ या कालावधीतील रु. ३८७० कोटी या संभाव्य खर्च वाढीस दिनांक २५.०८.२०२२ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे राज्य शासनाची मान्यता प्रदान केली आहे. त्यास अनुसरून केंद्र शासनाने दिनांक २९.०२.२०२४ रोजीच्या पत्राद्वारे मुंबई मेट्रो मार्ग-३ प्रकल्पाची सुधारित किंमत व सुधारीत वित्तीय आराखडा अंतिम केला आहे व रू.३७२७५.५० कोटी या सुधारीत प्रकल्प किंमतीस मान्यता प्रदान केली आहे.

मुंबई मेट्रो रेल्वे लाईन ३-प्रकल्पाच्या सुधारीत प्रकल्प किंमतीनुसार राज्य शासनाकडून रु.४८३५.५५ कोटी इतकी दुय्यम कर्ज रक्कम द्यावयाची आहे. त्यापैकी, आतापर्यंत रु. २५८७.७५ कोटी निधी मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. कंपनीस राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्यात आला आहे. चालू आर्थिक वर्षी सन २०२४-२५ मध्ये राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य या प्रयोजनाकरिता रु.१७५७.२२५० कोटी इतकी (मूळ व पुरवणी) अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर मंजूर तरतूदीमधून **रु. २७८.६१२५ कोटी** इतकी रक्कम मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. कंपनीस राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय -</u>

१. मुंबई मेट्रो रेल्वे मार्ग-३(कुलाबा-वांद्रे-सीप्झ) प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून **रु.२७८,६१,२५,०००/- (अक्षरी रुपये दोनशे अठठ्यात्तर कोटी एकसष्ठ लाख पंचवीस हजार फक्त)** इतकी रक्कम **मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि., मुंबई** यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७, ६२१७- नगर विकासासाठी कर्जे ,८०, सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५, कर्जे व आगाऊ रकमा, सांकेतांक क्रमांक (६२१७०७७९) या लेखाशिर्षाखाली **सन २०२४-२५** मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी. सदरचे निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी/नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव/नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद -१ मध्ये नमूद करण्यात आलेली **रू.२७८.६१२५ कोटी** रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यास देण्यासाठी नियंत्रक अधिकारी/आहरण व संवितरण अधिकारी यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही कार्यासन नवि- ३१ ने करावी.

४. राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात येणारी उपरोक्त नमूद **रु. २७८.६१२५ कोटी** रक्कम ही मुंबई मेट्रो मार्ग-३ प्रकल्पासाठी मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडला केंद्रीय/ राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी तसेच खाजगी जमीनीचे संपादन/पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी वितरीत करण्यात येत आहे.

५. राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत रक्कम **रु. २७८.६१२५ कोटी** मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्याकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून सदर प्रकल्पासाठी जपान आंतरराष्ट्रीय सहकार्य संस्थेमार्फत घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करण्यात यावी.

६. सदर प्रकल्पाच्या मुळ मान्यतेनुसार सदरचे दुय्यम कर्ज बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरीत करण्यात येत असले तरी भविष्यात यावर व्याज आकारणी करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास त्या व्याजाची वसूली मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्याकडून करण्यात येईल.

७. सदर कर्ज सहाय्याची रक्कम व भविष्यात त्यावर काही व्याज आकारल्यास त्या व्याजाच्या रक्कमेसह सदर प्रकल्पाचे मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

८. मुंबई मेट्रो लाईन-३ या प्रकल्पाकरिता राज्य शासनाकडून केंद्रीय व राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी तसेच खाजगी जमीनीचे संपादन/पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड कडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

९. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण/राज्य शासन/केंद्र शासन यांना सादर करण्यात यावा.

१०. सदर प्रकल्पासाठी राज्यशासनामार्फत केंद्रीय व खाजगी जमिनीचे संपादन/पुनर्वसन व पुनर्वसाहत यावरील खर्चासाठी तसेच राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रकमांसाठी मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत.

११. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर दुय्यम कर्ज सहाय्यासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

१२. मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्या वतीने महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

१३. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

१४. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी, दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१५. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो मार्ग-३ प्रकल्पाकरीता आतापर्यंत **रू. ३९९९.७०२५ कोटी** इतका निधी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती पुढीलप्रमाणेः-

| अनु.क्र. | दिनांक | रक्कम (रु. कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | १३.१०.२०१५ | ५५.३२ | राज्य शासन | ५५.३२ |
| २ | ३१.०३.२०१७ | ९०.४७ | राज्य शासन | १४५.७९ |
| ३ | २८.०३.२०१८ | १३०.०० | राज्य शासन | २७५.७९ |
| ४ | ०३.१२.२०१८ | १८०.०० | राज्य शासन | ४५५.७९ |
| ५ | २०.०३.२०१९ | ३२०.०० | राज्य शासन | ७७५.७९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | १८०३.२०.२० | ३००.०० | राज्य शासन | १०७५.७९ |
| ७ | २७.०३.२०२० | २००.०० | राज्य शासन | १२७५.७९ |
| ८ | ०४.०३.२०२१ | ३००.०० | राज्य शासन | १५७५.७९ |
| ९ | २६.०४.२०२१ | १००.०० | राज्य शासन | १६७५.७९ |
| १० | १८.०१.२०२२ | २५०.०० | राज्य शासन | १९२५.७९ |
| ११ | १७.०३.२०२२ | २५०.०० | राज्य शासन | २१७५.७९ |
| १२ | २९.०७.२०२२ | १४७.१८ | राज्य शासन | २३२२.९७ |
| १३ | २८.०९.२०२२ | ९८.१२ | राज्य शासन | २४२१.०९ |
| १४ | २७.०३.२०२४ | १००.०० | राज्य शासन | २५२१.०९ |
| १५ | १४.०५.२०२४ | ६६.६६ | राज्य शासन | २५८७.७५ |
| १६ | २६.०९.२०२४ | ११३३.३४ | राज्य शासन | **३७२१.०९** |
| १७ | २०.०१.२०२५ | २७८.६१२५ | राज्य शासन | **३९९९.७०२५** |
| १८ | सदरचे वितरण | २७८.६१२५ | राज्य शासन | **४२७८.३१५०** |

१६. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४ रोजीच्या परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१०१/व्यय-३,दि.२५/०३/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२७१६२९२६५७२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.27 16:34:01 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि. मुंबई
८. महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
९. महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .

१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१३. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३.

१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४)

१५. सह सचिव (नवि-५), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१६. कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .

१७. रोख शाखा (३ प्रती),

१८. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.२१०/नवि-७, दि. २७ मार्च, २०२५ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना मुंबई मेट्रो रेल मार्गिका-३ साठी सन २०२४-२५ मध्ये रु.२७८.६१२५ कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.<br>प्लॉट नं.आर.१३, ई-ब्लॉक, नामट्री बिल्डींग, बीकेसी, वांद्रे (पूर्व),<br>मुंबई ४०० ०५१. |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | अनौ. सं क्र.१०१/व्यय-३, दि. २५/०३/२०२५. |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.४८३५.५५ कोटी दुय्यम कर्ज |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१५-१६ रु.५५.३२ कोटी<br>सन २०१६-१७ रु.९०.४७ कोटी<br>सन २०१७-१८ रु.१३०.०० कोटी<br>सन २०१८-१९ रु.५००.०० कोटी<br>सन २०१९-२० रु.५००.०० कोटी<br>सन २०२०-२१ रु. ४००.०० कोटी<br>सन २०२१-२२ रु.५००.०० कोटी<br>सन २०२२-२३ रु.२४५.३० कोटी<br>सन २०२३-२४ रु.१००.०० कोटी<br>सन २०२४-२५ रू.१४७८.६१२५ कोटी<br>(या निधी वितरण आदेशापुर्वी) |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु. २७८.६१२५ कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **रु. २७८.६१२५ कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | मुख्य कर्जाची परतफेड झाल्यावर दुय्यम कर्जाची परतफेड सन २०४७ मध्ये सुरु होईल. त्यानंतर सदर दुय्यम कर्जाची वसूली एका हप्त्यात वसूली होणे अपेक्षित आहे. |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही. |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.27 16:34:32 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | सन २०५२ |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | सन २०५२ |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | सन २०५२ |
| १४. | व्याज दर | बिनव्याजी दुय्यम कर्ज |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनिय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | लागू नाही. |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे, ८०, सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना (००)(०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५ कर्जे व आगाऊ रक्कम, सांकेतांक क्रमांक (६२१७००७७९) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | लागू नाही. |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | संचालक (वित्त),<br>मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.,प्लॉट नं.आर.१३, ई-ब्लॉक, नामट्री बिल्डींग, बीकेसी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.<br>फोन नं.०२२/२६३८४६१७. |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.27 16:34:55 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**